**जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीची {Programme Implementation and Monitoring Committee }(PIMC) पुनर्रचना करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्र.: अंश्रनि-२०२०/प्र.क्र. १८१/सामासु**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ०२ मार्च, २०२२

<u>वाचा:</u>
१) महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समुळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३.
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. अंश्रनि-२०१४/ प्र.क्र. २९३/सामासु, मंत्रालय, दि. १२ ऑगस्ट, २०१४.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. अंश्रनि-२०१६/ प्र.क्र. ३३०/सामासु, मंत्रालय, दि. ५ जानेवारी, २०१७.
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.०८/समन्वय, दि. १७ मार्च, २०२०.

<u>प्रस्तावना :</u>

भारतीय समाजात रुजलेल्या काही अनिष्ट, अघोरी, अमानुष संस्कारातून रुजलेल्या अनेक प्रकारच्या गैरसमजुतीमुळे समाजाचे अतोनात नुकसान होत असल्याचे दिसून येत आहे. लाखों माणसांचे जीव वाचविण्यासाठी त्यांचे होणारे शोषण व छळ थांबविण्यासाठी व समाजाचे मानसिक स्वास्थ सुधारण्यासाठी शासनाने दिनांक २० डिसेंबर, २०१३ रोजी महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समुळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३ जारी करण्यात आला आहे.

जादुटोणा विरोधी कायद्यामुळे लाखो माणसांचा होणारा छळ, शोषण व त्यांचे जीव वाचणार आहेत. त्याकरिता समाजप्रबोधन करुन महाराष्ट्र राज्यातील सामान्य जनतेच्या मनातील गैरसमजुती दूर करणे गरजेचे आहे. संस्कारातून रुजलेल्या गैरसमजुतीमुळे जातीयता, उच्चनिचता, गटपंथांमधील परस्पर द्वेष, स्त्री-पुरुष असमानता, दारिद्रय अशा मानवतेसाठी घातक असणाऱ्या गोष्टी अजुनही समाजात अस्तित्वात आहेत. त्यात बदल होणे आवश्यक असून त्यासाठी जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार कार्यक्रम अंमलबजावणी समितीची {Programme Implementation and Monitoring Committee (PIMC)} संदर्भाकित शासन निर्णय दि. ५ जानेवारी, २०१७ अन्वये पुनर्रचना करण्यात आलेली आहे. तद्नंतर सदर समितीतील ७ अशासकीय सदस्यांची नियुक्ती संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. १७ मार्च,२०२० च्या आदेशान्वये रद्द करण्यात आलेली आहे. तरी नवीन अशासकीय सदस्यांचा समावेश करुन सदर समितीचे पुनर्गठन करणे आवश्यक असल्याने दि. ५ जानेवारी,२०१७ अन्वये गठीत केलेल्या “जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीची” पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समुळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३, दि ३० डिसेंबर, २०१३ रोजी जारी केलेला आहे. सदर कायद्याची परिणामकारक व योग्य अंमलबजावणी करण्यासाठी मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखाली जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीची (Programme Implementation and Monitoring Committee) (PIMC) पुनर्रचना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती {Programme Implementation and Monitoring Committee}(PIMC)

| अ.क्र. | नाव व पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री (सामाजिक न्याय) | अध्यक्ष |
| २. | मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) | उपाध्यक्ष |
| ३. | अपर मुख्य सचिव (सामाजिक न्याय) | सदस्य |
| ४. | सचिव, गृह विभाग | सदस्य |
| ५. | सचिव, विधी व न्याय विभाग | सदस्य |
| ६. | सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ७. | सचिव, शालेय शिक्षण. युवा व क्रीडा विभाग | सदस्य |
| ८. | सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | सदस्य |
| ९. | सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग | सदस्य |
| १०. | सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ११. | सचिव, ग्रामविकास विभाग | सदस्य |
| १२. | सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| १३. | सचिव, माहिती व जनसंपर्क विभाग | सदस्य |
| १४. | सचिव, महिला व बालविकास विभाग | सदस्य |
| १५. | सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| १६. | श्री. श्याम मानव, संस्थापक व संघटक, अ.भा. अं.नि.स. | सह अध्यक्ष |
| १७. | ॲड. मुक्ता दाभोलकर, मुंबई,महा.अंनिस | सदस्य |
| १८. | श्री. प्रशांत एस. पोतदार, सातारा, महा.अंनिस | सदस्य |
| १९. | श्रीमती नंदिनी जाधव, पुणे महा.अंनिस | सदस्य |
| २०. | श्री.सुभाष दगडखैर, मुंबई | सदस्य |
| २१. | श्री.अविनाश पाटील, धुळे, महा.अंनिस | सदस्य |
| २२. | प्रा.श्री.हरीभाऊ पाथोडे, चंद्रपूर, महाराष्ट्र संघटक, अ.भा. अं.नि.स. | सदस्य |
| २३ | ॲड रंजना गवांदे, संगमनेर,महा.अंनिस | सदस्य |
| २४ | श्री.सुरेश झुरमुरे, कार्याध्यक्ष, अ.भा. अं.नि.स. | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| २५ | श्रीम.छाया सावरकर, राज्य महिला प्रमुख, अ.भा. अं.नि.स. | सदस्य |
| २६ | श्री. मधुकर कांबळे, अध्यक्ष, अ.भा. अं.नि.स. | सदस्य |
| २७ | श्री.रमण ठवकर, उपाध्यक्ष, राष्ट्रवादी कॉंग्रेस कमिटी, नागपूर शहर | सदस्य |
| २८ | आयुक्त,समाजकल्याण, पुणे | सदस्य सचिव |

सदर समितीची बैठक वर्षातून किमान २ वेळा होईल. समितीतील अशासकीय सदस्यांना वित्त विभागाने निर्धारित केलेले भत्ते नियमानुसार अनुज्ञेय राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळांवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३०३११३२४४१५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: CN = RAJENDRA NATHA SAVANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT
Date: 2022.03.07 12:37:50 +05'30'

**(रा.ना. सवने)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहाय्यक
४) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) अप्पर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव / सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मुंबई
७) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
८) सर्व विभागीय आयुक्त
९) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०) सर्व पोलीस अधिक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी/सहायक आयुक्त, समाजकल्याण
१६) सर्व संबंधित जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती सदस्य.
१७) निवड नस्ती, सामासु